महाराष्ट्रातील पोलीस अधिकारी/
कर्मचारी यांना प्रशंसनीय सेवेबद्दल यापुढे
बोधचिन्हे व प्रशस्तीपत्रे प्रदान
करण्याबाबत तसेच नक्षलग्रस्त भागांत
काम करणा-या पोलीस अधिकारी/
कर्मचारी यांना विशेष सेवापदक
प्रदान करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक-पीएमडी १२९०/२२४४/प्र.क्र.२१/पोल - १
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक- २२ जुलै १९९२.

वाचा- १) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,
मुंबई यांचे अर्धशासकीय पत्र क्र.१५/९०७५, दिनांक -
१८ जून १९९०.

२) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,
मुंबई यांचे पत्र क्र. विशा क्र.१५/९०७५, दि.८ फेब्रुवारी ९१.

<u>शासन निर्णय</u>:- महाराष्ट्रातील पोलीस दलामध्ये निरनिराळ्या दर्जाचे पोलीस अधिकारी व कर्मचारी यांची संख्या १.२५ लाख आहे. प्रतिवर्षी प्रजासत्ताक दिनी व स्वातंत्र्यदिनी राज्य शासनाने शिफारस केलेल्या पोलीस अधिकारी / कर्मचा-यां-पैकी केंद्र शासनाने निवड केलेल्या पोलीस अधिकारी / कर्मचा-यांना उल्लेखनीय सेवेसाठी राष्ट्रपती पोलीस पदके व गुणवत्ता पूर्ण सेवेसाठी पोलीस पदके देण्यात येतात. साधारणपणे प्रजासत्ताक दिनी व स्वातंत्र्य दिनी प्रत्येकी २ राष्ट्रपती पोलीस पदके व २० पोलीस पदके महाराष्ट्रातील पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना प्रदान करण्यात येतात. पोलीस दलाची एकूण संख्या लक्षात घेता, उत्कृष्ट कामगिरी करणा-या पोलीस अधिकारी/कर्मचा-यांपैकी बहुतांश पोलीस अधिकारी/कर्मचारी अशा गौरवास वंचित रहातात. या परिस्थितीत उत्कृष्ट कामगिरी बजावणा-या तथापी, राष्ट्रपती पोलीस पदक व पोलीस पदक मिळण्यापासून वंचित राहिलेल्या पोलीस अधिकारी/कर्मचा-यांच्या उत्कृष्ट सेवेची दखल घेण्यासाठी व उत्तम कामगिरी बद्दल प्रतिवर्षी पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना, तसेच गडचिरोली व चंद्रपूर व राज्यातील ज्या अन्य जिल्ह्यात नक्षलवाद्यांच्या हिंसक व बेकायदेशीर कारवायांना परिणामकारकरित्या आळा घालण्यासाठी शासनाकडून जी कृति योजना लागू करण्यात आली त्या जिल्ह्यामध्ये नेमण्यात आलेले पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना त्यांच्या खडतर सेवेबद्दल "विशेष सेवा पदक" देण्या-बाबतची बाबही शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने सर्व बाबींचा

सखोल विचार करून खालील प्रमाणे निर्णय घेणेत आहेत.

२. (अ) ज्या पोलीस अधिकाऱ्यांना / कर्मचाऱ्यांना लागोपाठ तीन वेळा राज्य शासनाने ८ शिफारस केल्यानंतरही राष्ट्रपती पोलीस पदक / पोलीस पदक प्रदान करण्यात आलेले नसेल अशा पोलीस अधिकाऱ्यांना / कर्मचाऱ्यांना पोलीस महासंचालकांकडून निर्धारित बोधचिन्हे व प्रशस्तीपत्रके प्रदान करण्यात यावीत असा निर्णय शासनाने घेतला आहे. सदरहू निर्णय १९८८ पासून [redacted] राज्य शासनाने सदर पदकासाठी शिफारस केलेल्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या बाबतीत लागू करण्यात यावा.

(ब) तसेच खालील बाबतीत उत्तम कामगिरीबद्दल प्रतिवर्षी जास्तीत जास्त ५० पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना पोलीस महासंचालकांकडून निर्धारित बोधचिन्हे व प्रशस्तीपत्रे प्रदान करण्यात यावीत.

१. खंडखोर दरोडेखोर गुन्हेगारांच्या टोळ्या किंवा अघोर व तंत्रबद्ध गुन्हे करणाऱ्या गुन्हेगारांच्या विरुद्ध अराधारी कारवाई.
२. सर्व प्रकारच्या सनसनाटी व कठीण गुन्ह्यांचा यशस्वीपणे शोध लावून तपास करणे.
३. नैसर्गिक आपत्तीच्यावेळी मदत कार्य करणे.
४. जनतेच्या समस्या सोडवून पोलीसांची प्रतिमा उजळ करणे.
५. राष्ट्रीय स्तरावरील खेळांत प्राविण्य दाखविणे.
६. पोलीसांच्या कामात सुधारणा घडविण्याकरिता कार्यपद्धतीत अभ्यास देवील अशा सूचना करणे.
७. २५ वर्षाच्या सेवेचे रेकॉर्ड उत्तम राखल्याबद्दल.
८. पोलीस मोटार परिवहन विभागातील चालक यांनी अपघात न करता २० वर्षांचे रेकॉर्ड उत्तम ठेवल्याबद्दल.
९. पिपील शाखेत [ प्रशिक्षण संस्था धरून ] ५ वर्षे उत्तम कामगिरी केल्याबद्दल.
१०. प्रशंसनीय स्वरूपाचे अन्य कार्य व अत्युत्तम काम केल्याबद्दल.

(क) गडचिरोली व चंद्रपूर तसेच राज्यातील ज्या अन्य जिल्ह्यात नक्षलवाद्यांच्या हिंसक व बेकायदेशीर कारवायांना परिणामकारकरित्या आळा घालण्यासाठी शासनाकडून जी कृति-योजना लागू करण्यात आली आहे त्या जिल्ह्यांमध्ये नेमण्यात येणाऱ्या पोलीस अधिकारी/कर्मचाऱ्यांना, वरील विभागात नक्षलवाद्यांच्या हालचाली टिपणारे गुन्हा अन्वेषण विभाग (गुप्तवार्ता) मधील पोलीस अधिकारी / कर्मचारी यांना तेथे दोन वर्षे पूर्णपणे समाधानकारक सेवा केल्यानंतर

[ तीन वर्षांच्या कालावधीतील खंडीत कालावधी एकत्रित करून होणारा कालावधी धरून ] व वरील विभागात बंदोबस्ताकरिता नेमण्यात आलेले राज्य राखीव पोलीस बलातील जे अधिकारी / कर्मचारी तीन वर्षांमध्ये एक वर्षाचा सेवाकाळ पूर्ण करतील त्यांना " विशेष सेवा पदक " प्रदान करण्यात यावे.

३. वरील परिच्छेद-२(बी) नुसारचे निर्णय हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. यासाठी होणारा खर्च रु. ११,०००/- [रुपये अकरा हजार फक्त] "२०५५-पोलीस-००१-संचालन व प्रशासन पोलीस निरीक्षणालय" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन १९९२-९३ या आर्थिक वर्षासाठी नवीन बाब भाग-२ द्वारा मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-१२६/९२/व्यय-७, दि. १.२.१९९२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

र. ना. चिन्मुळगुंद

[ रा. ना. चिन्मुळगुंद ]

सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

महालेखापाल-१ [लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा], महाराष्ट्र, मुंबई.

महालेखापाल-२ [लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा], महाराष्ट्र, नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

संचालक [संगणक शाखा] लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.

वित्त विभाग, व्यय-७,

गृह विभाग, पोवुडी-२/

लेखा अधिकारी, आ.पो.ले. सेल, गृह विभाग,

निवडनस्ती.